नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाच्या पथदिवे व पाणी पुरवठा योजनांची वीज देयके वित्त आयोगाच्या निधीतुन अदा करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन परिपत्रक क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.६४/नवि-४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १२ ऑक्टोबर, २०२१.

संदर्भ :-

१. नगर विकास विभाग,शासन निर्णय क्र.एफएफसी- २०२०/प्र.क्र.५६/नवि-४,दि. २८.१०.२०२०.
२. नगर विकास विभाग,शासन निर्णय क्र.एफएफसी- २०२०/प्र.क्र.५६/नवि-४,दि. ३०.०४.२०२१.
३. नगर विकास विभाग,शासन निर्णय क्र.एफएफसी- २०२०/प्र.क्र.५६/नवि-४,दि. ०३.०५.२०२१.
४. नगर विकास विभाग,शासन निर्णय क्र.एफएफसी- २०२०/प्र.क्र.५६/नवि-४,दि.०६.१०.२०२१.

प्रस्तावना :-

संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये १५ वित्त आयोगाअंतर्गत राज्यातील Non-Million Plus Cities गटातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाकरिता प्राप्त अनुदानाचे वितरण व विनियोगाबाबतची कार्यपध्दती निश्चित करण्यात आलेली आहे. संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये Million Plus Cities गटातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाकरिता पाणी पुरवठा व व्यवस्थापनात सुधारणा व प्रभावी घनकचरा व्यवस्थापन यासाठी बंधनकारक अनुदानाच्या (Tied Grants for Improving conservation, supply and management of water and efficient solid waste management) वितरणाची व विनियोगाबाबतची कार्यपध्दती निश्चित करण्यात आलेली आहे.तसेच याबाबतच्या कार्यवाहीच्या मार्गदर्शक सुचना शासन निर्णय क्र. एफएफसी-२०२०/प्र.क्र.५६/नवि-४,दि.०६.१०.२०२१ अन्वये विहीत केल्या आहेत. राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या क्षेत्रातील पथदिवे व पाणीपुरवठा योजनेच्या थकीत वीज देयकाबाबत उर्जा विभागाकडून या विभागाकडे सातत्याने पाठपुरावा सुरु आहे.यासंदर्भात राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना सुचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

**अ) राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या क्षेत्रातील पथदिवे व पाणीपुरवठा योजनेच्या वीज देयक अदा करणे याबाबत खालील सुचना देण्यात येत आहेत.**

**०१.** राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या क्षेत्रातील पथदिवे व पाणीपुरवठा योजनेच्या थकीत वीज देयकाची रक्कम प्रथमत: स्वनिधीतून अदा करणे त्यांच्यावर बंधनकारक आहे.त्यानुसार त्यांनी अशा थकित वीज देयकाच्या रकमा स्वनिधीतुन अदा कराव्यात. तसेच नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडे असणाऱ्या १२ वा वित्त आयोग,१३ वा वित्त आयोग आणि १४ व्या वित्त आयोगाचा शिल्लक निधी व त्यावरील व्याजातून पथदिवे व पाणीपुरवठा योजनेच्या थकीत वीज देयकाची रक्कम अदा कराव्यात.

**०२.** १५ वित्त व्या आयोगाअंतर्गत **Non-Million Plus Cities** गटातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना मुलभुत/अबंधनकारक अनुदान(Basic/Untied Grants) व बंधनकारक अनुदान (Tied Grants) वितरीत करण्यात येते. यातील मुलभुत/अबंधनकारक अनुदानातुन (Basic/Untied Grants) पथदिवे आणि पाणीपुरवठा योजनेची चालू वीज देयके अदा करता येतील. याबाबतच्या सुचना शासन निर्णय एफएफसी-

२०२०/प्र.क्र.५६/नवि-४, दिनांक २८.१०.२०२० मधील परिच्छेद (II) (ब) (१) नुसार यापुर्वीच दिल्या आहेत. त्यानुसार चालू वीज देयके देण्याबाबत सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थानी कार्यवाही करावी. त्याशिवाय पाणी पुरवठा व व्यवस्थापनात सुधारणा (सांडपाणी व मलनिस्सारणासह) यासाठी बंधनकारक अनुदानातून (Tied Grants for Improving conservation, supply and management of water including waste water & sewerage )पाणीपुरवठा योजनेची चालू वीज देयकांचा काही भाग अदा करता येईल. त्यासाठी पाणी पुरवठा योजनेशी संबधीत अन्य बाबींवर करावा लागणारा खर्च विचारात घेऊन उर्वरित निधी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना चालू वीज देयकांचे प्रदान करण्यासाठी करता येईल.

०३. Million Plus Cities गटातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्था पाणी पुरवठा व व्यवस्थापनात सुधारणा व प्रभावी घनकचरा व्यवस्थापन यासाठी बंधनकारक अनुदानतील (Tied Grants for Improving conservation, supply and management of water and efficient solid waste management) ५०% पाणी पुरवठा व व्यवस्थापनात सुधारणा (Improving conservation, supply and management of water) साठी खर्च करु शकतात. पाणी पुरवठा व व्यवस्थापनात सुधारणा (Improving conservation, supply and management of water) यासाठी बंधनकारक अनुदानातून पाणीपुरवठा योजनेची चालू वीज देयकांचा काही भाग अदा करता येईल. त्यासाठी पाणी पुरवठा योजनेशी संबधीत अन्य बाबींवर करावा लागणारा खर्च विचारात घेऊन उर्वरित निधी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना चालू वीज देयकांचे प्रदान करण्यासाठी करता येईल.

**ब) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडून वापरण्यात येणाऱ्या वीजेच्या वापरामध्ये व परिणामी वीज वापरात कपात करण्याच्या/ वीजदेयकाच्या बोजामध्ये बचत करण्यासाठी खालील उपाययोजना परिणामकारकपणे राबवाव्यात.**

०१. पथदिव्यांच्या बाबतीत २ पोलमधील अंतर फारच कमी असेल ते आवश्यकतेनुसार वाढविण्यात यावे.

०२. आवश्यकतेनुसार एकाआडएक (Alternate) पथदिवे बंद ठेवण्याबाबतदेखील स्थानिक परिस्थितीनुसार विचार करण्यात यावा.

०३. पथदिवे सुरू करण्याची वेळ, स्थानिक सुर्योदय व सुर्यास्तानुसार व आवश्यकतेनुसार निश्चित करण्यात यावी व आवश्यक असेल त्या कालावधीतच पथदिवे सुरू राहतील याची निश्चिती करावी. आवश्यकता नसतांना पथदिवे सुरू केले जाणार नाहीत किंवा आवश्यकता संपल्यानंतर पथदिवे सुरू राहणार नाहीत याची काटेकोर दक्षता घ्यावी. याबाबतची जबाबदारी संबंधित कर्मचाऱ्यांवर निश्चित करण्यात यावी.

०४. कोणत्याही प्रकारे विजेचा अपव्यय होऊ नये याची दक्षता घेण्यात यावी व वीज वापरामध्ये बचतीची दक्षता घ्यावी.

०५. कोविड-१९ च्या कालावधीत सुरूवातीला महावितरण कंपनीकडून सरासरी (Average) देयके देण्यात आली होती. सदर सरासरी देयके पुढे जाऊन नियमित वीज वापरावर आधारीत देण्यात आली आहे किंवा कसे, याबाबत तपासणी करुन घ्यावी व त्यानुसार कोणत्याही ठिकाणी नियमित वीज वापरानुसार देयके सुधारीत झाली नसल्यास अशी बाब महावितरणच्या अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणावी व त्यांच्याकडून आवश्यक ती सुधारणा करुन घेण्यात यावी.

**०६.** नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या प्रत्येक मीटरसाठी वापराच्या प्रकारानुसार (जसे पथदिवे, पाणी पुरवठा, कार्यालय इत्यादी) महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाने निश्चित केलेल्या लागू दरपत्रकानुसार (Tarrif Plan) आकारणी केली जात आहे किंवा कसे याची एक उपभोक्ता म्हणून तपासणी करावी व काही त्रुटी आढळल्यास अशी बाब महावितरणच्या अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणावी व त्यांच्याकडून आवश्यक ती सुधारणा करुन घेण्यात यावी.

**०७.** उर्जा बचतीच्या या सर्व उपाययोजना राबविण्याची जबाबदारी संबंधीत आयुक्त, महानगरपालिका/मुख्याधिकारी,नगरपरिषद/नगरपंचायती तसेच स्थानिक स्वराज्य संस्थेतील सर्व अधिकारी/कर्मचारी यांची सयुंक्त जबाबदारी राहील.याबाबत कार्यवाही करताना वैयक्तिक उर्जा बचतीसाठी जी दक्षता घेतली जाते तशीच दक्षता घेणे हे सर्व संबधीतांचे कर्तव्य व जबाबदारी राहील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२११०१२१५४८०९२२२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PANDURANG JOTIBA JADHAV

Digitally signed by PANDURANG JOTIBA JADHAV
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=PANDURANG JOTIBA JADHAV
Date: 2021.10.13 18:08:00 +05'30'

**( पां. जो. जाधव )**
**सह सचिव,**
**नगर विकास विभाग**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/सचिव
२) मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव
३) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव (उर्जा),उद्याग उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
६) व्यवस्थापकीय संचालक,महावितरण,मुंबई
७) आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
८) महालेखापाल कार्यालय, (लेखापरीक्षा)) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
९) महालेखापाल कार्यालय, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
१०) संचालक, नगर रचना, पुणे
११) अग्निशमन सल्लागार, राज्य अग्निशमन प्रशिक्षण केंद्र, कोळे कल्याण, मुंबई,
१२) आयुक्त, सर्व महानगरपालिका
१३) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१५) मुख्याधिकारी, सर्व नगरपालिका/नगरपंचायती
१६) मुख्य कार्यकारी अधिकारी,सर्व कटकमंडळे
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८) प्रधान सचिव (नवि-२) नगर विकास विभाग, यांचे स्वीय सहायक.
१९) निवडनस्ती नवि-४ कार्यासन, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.